**भूपृष्ठावरील पाण्याच्या उपलब्धतेची अचूक माहिती मिळविण्यासाठी जागतिक बँकेकडून मिळणा-या अर्थसहाय्यीत जलविज्ञान प्रकल्पाच्या टप्पा - २ मधील कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**

शासन निर्णय क्र. जविप्र २०१०/१९३/(६१/२०१०) जसंनि
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक - १७/०९/२०१०

संदर्भः १) महाराष्ट्र शासन,पाटबंधारे विभाग,शासन निर्णय क्रमांक एनएचपी -१०९३(६५/९३) जसंनि दि. २२ नोव्हेंबर,१९९५.

२) महाराष्ट्र शासन,पाटबंधारे विभाग,शासन निर्णय क्रमांक एनएचपी -१०९९(९३/९९) जसंनि भाग,१ दि. १६ मे,२०००

३) महाराष्ट्र शासन,पाटबंधारे विभाग,शासन निर्णय क्रमांक एनएचपी -१०९३(९३/९९) भाग,३ जसंनि, दि. ११/ १२/ २००२

४)महाराष्ट्र शासन,पाटबंधारे विभाग,शासन निर्णय क्रमांक एपीएस -१०७३/३२६५३-इ (३) दि. १७/७/१९७४

५) मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांचे पत्र क्र. एचपी-२ /तां शा १ ( १३/१ / २००५ ) ४८४, दिनांक ६/४/२००५ दि १७/८/२००५ चे पत्र .

६) महाराष्ट्र शासन,पाटबंधारे विभाग,शासन निर्णय क्रमांक जपिप्र -२००५/ २८१ ( १३८ / ०५ ) जसंनि, दि. २५ /१०/२००५

७) मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक यांचे पत्र क्र. जविप्र/तांशा-१/(२९७/२००९)/ ३४२/२०१०,दि. ८/२/२०१०.

**प्रस्तावना**

जागतिक बँकेच्या अर्थ सहाय्याने जलविज्ञान प्रकल्प टप्पा १ हा नोव्हेंबर १९९५ ते डिसेंबर २००३ मध्ये यशस्वीरित्या पूर्ण करण्यात आला . त्या अंतर्गत अस्तित्वातील पर्जन्यमापन केंद्रांचे नुतनीकरण, नवीन पर्जन्यमापन केंद्रांची उभारणी, नवीन हवामान केंद्रांची उभारणी, नवीन सरितामापन केंद्रांची उभारणी व दर्जावाढ, जलगुणवत्ता प्रयोगशाळा उभारणी व अद्यावत करणे, जलविज्ञान प्रकल्पांतर्गत सर्व यंत्रणांचे संगणकीकरण करणे आणि आवश्यक त्या ठिकाणी कार्यालयाच्या इमारती व निवासी इमारती बांधणे इत्यादी कामांचा समावेश होता. या प्रकल्पांतर्गत भूपृष्ठावरील व भूपृष्ठाखालील उपलब्ध जलसंपत्ती विषयक तसेच जलगुणवत्ता व हवामान विषयक आधारसामग्रीचा सर्वांगिण विकास व उपयोग व्हावा हा मुख्य उद्देश होता. जलविज्ञान प्रकल्प टप्पा-१ मुळे भूपृष्ठजल जलशास्त्रीय माहिती प्रणाली (Hydrological Information System) विकसीत

होऊन विश्वासार्ह, प्रमाणित व संगणकीकृत आधारसामग्री उपभोक्त्यास उपलब्ध झाली आहे. जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ राबविण्यासाठी जलसंसाधन मंत्रालय, भारत सरकार यांच्या मार्फत जागतिक बँकेबरोबर दि. १९ जाने.२००६ रोजी करार करण्यात आला असून तो करार दि. ५ एप्रिल २००६ पासून कार्यान्वित करण्यात आलेला आहे. हा प्रकल्प ६ वर्षात पूर्ण करावयाचा असून त्याची मुदत ३० जून २०१२ पर्यत आहे.

जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ ची प्रशासकीय मान्यता देताना त्यावेळचे अंदाजपत्रक सन २००३-०४ च्या दरावर आधारित होते. जागतिक बँकेबरोबर करारनामा होण्यास सुरुवातीला उशिर झाला तसेच केंद्र शासन स्तरावर ३ प्रमुख सल्लागारांच्या नियुक्तीस अतिशय उशिर झाल्यामुळे या प्रकल्पाचे काम सुरुवातीच्या काळात वेगाने होऊ शकले नाही यामुळे प्रत्यक्ष खर्चात वाढ झाली. त्याचप्रमाणे सन २००४ ते २००९ या कालावधीत ६ व्या वेतन आयोगानुसार कर्मचा-यांच्या वेतनात वाढ झाल्याने आवर्ती खर्चात (Recurrent Costs) वाढ झालेली आहे. जागतिक बँक पथकाने प्रकल्पाचे उद्दिष्ट तपासणे, प्रगतीचा तसेच एकूणच कामांचा नव्याने आढावा घेऊन प्रकल्पामध्ये काही आवश्यक बदल व सुधारणा (Restructuring of project) करणे यासाठी जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ चा मिड-टर्म रिव्हयु १ ऑक्टोबर ते १४ ऑक्टोबर २००९ दरम्यान घेतला. या मिड टर्म रिव्हयू मध्ये कृष्णा व भिमा नदी खो-यामध्ये एककालीक पूर पुर्वानुमान पध्दती (Real time data acquisition system and flood forecasting) साठी आवश्यक अभ्यास व यंत्रणा कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक निधी मंजूर करण्यास जागतिक बँकेने संमती दिली आहे.त्याअनुषंगाने जलसंसाधन मंत्रालय नवी दिल्ली यांनी यासाठी अधिकच्या निधीची तरतूद करण्यास दिनांक १९ जानेवारी, २०१० च्या पत्रान्वये सहमती दिली आहे. उपरोक्त सर्व बाबीसाठी आवश्यक निधीची तरतूद करण्यासाठी नव्याने तयार केलेल्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ च्या प्रत्यक्ष खर्चात झालेली वाढ व सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनात झालेली वाढ यामुळे होणारा अधिकचा, खर्च रुपये १०८७.०० लक्ष आणि कृष्णा व भिमा नदी खो-यामध्ये एककालीक पूर पूर्वानुमान यंत्रणा (Real time data acquisition system and flood forecasting) कार्यान्वित करण्यासाठी झालेली रुपये ३०३३.०० लक्ष रकमेची वाढ अशा प्रकारे जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ चे सुधारित अंदाजपत्रक रु.४०४१.७ लक्ष इतक्या किंमतीचे झाले आहे. जागतिक बँकेशी झालेल्या करारानुसार यापैकी रु.३८७५.५ लक्ष प्रतिपूर्ती जागतिक बँकेकडून मिळणार आहे. सदर सर्व बाबींचा विचार करता जलविज्ञान प्रकल्प टप्पा - २ च्या रु ४०४१.७० लक्षच्या सुधारित अंदाजपत्रकास शासन खालीलप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता देत आहे.

## सुधारित अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट बाबी -.

(रुपये लक्ष मध्ये )

| अ.क्र | उपशिर्ष | मंजूर किंमत (मे २००४) | सुधारित अंदाजपत्रक (ऑक्टोबर २००९) | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | मूळ प्रकल्पातील व्याप्ती प्रमाणे | नवीन बाब | एकूण |
| (१) | **गुंतवणूक खर्च (Investment Costs)** | | | | |
| | स्थापत्य कामे | १२६.५५ | ३१.०० | २५०.०० | २८१.०० |
| | प्रशिक्षण | १६२.३० | १७९.१६ | १८.०० | १९७.१६ |
| | साधनसामग्री व प्रकाशने | ३३७.४८ | ३००.८८ | १५१५.०० | १८१५.८८ |
| | सल्लामसलत सेवा | ६७.२१ | ६९.९४ | १२५०.०० | १३१९.९४ |
| | एकूण(१) | ६९३.५४ | ५८०.९८ | ३०३३.०० | ३६१३.९८ |
| (२) | **आवर्ती खर्च (Recurrent Costs)** | | | | |
| | आवर्ती खर्च | २८९.३७ | ४२७.७२ | ०.०० | ४२७.७२ |
| | **एकूण(१+२)** | **९८२.९१** | **१००८.७०** | **३०३३.००** | **४०४१.७०** |

या प्रकल्पावर होणारा खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (योजनांतर्गत) (८०) सर्वसाधारण (८००) इतर खर्च (०७) (०१) जलविज्ञान प्रकल्प टप्पा नं. २ (४७०१ आय ९७५) या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्यामधील खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४६/१४३३, दिनांक १७.०३.२०१० आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १३४/व्यय-१२, दिनांक १३.०४.२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००९१७१९२६५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र.ना.घोडके)
शासनाचे उप सचिव

प्रत,

१) मा. मंत्री जलसंपदा, (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ), उर्जा यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा परिक्षा) १/ २, मुंबई / नागपूर.

३) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता) १/ २, मुंबई / नागपूर.
४) वित्त विभाग ( व्यय -१२ ) ,मंत्रालय, मुंबई.
५) नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई.
६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग , मंत्रालय, मुंबई.
७) महासंचालक, माहिती व प्रसिध्दी संचलनालय, मंत्रालय,मुंबई.
८) मुख्य अभियंता जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
९) अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री संकलन मंडळ नाशिक.
१०) अधीक्षक अभियंता, आधार सामुग्री पृथ्थकरण मंडळ, नाशिक.
११) आंतरवित्त सल्लागार व सहसचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) सर्व अधीक्षक अभियंता व पदसिध्द उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) अवर सचिव ( जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) अवर सचिव अर्थसंकल्प (१) ३ प्रती , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) जसंनि कार्यासन संग्रहार्थ.